**उस्मानाबाद व लातूर जिल्ह्यातील भूकंपामुळे इतरत्र पुनर्वसन झालेल्या गावातील सनद फी निर्लेखित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०१८/प्र.क्र.१४४/ल-१**
पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ जून, २०२०

संदर्भ :-

१) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र. ना.भू.२/कावि १८२/२०१७, दि. १७.०५.२०१७ चे पत्र

२) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र. ना.भू.२/कावि ३२६/२०१७, दि. ०८.०९.२०१७ चे पत्र

प्रस्तावना :-

सन १९९३ मध्ये झालेल्या विनाशकारी भूकंपात लातूर व उस्मानाबाद जिल्ह्यातील एकूण २३ गावातील संपूर्ण घरे उध्वस्त झाली. सदर गावांमध्ये धारकांच्या मिळकतीच्या हमी/बांधकामे जागेवर शिल्लक नाहीत. भूकंपामुळे संपूर्ण गावेच उध्वस्त झालेली असून, त्यांचे इतरत्र पूनर्वसन करणेत आले आहे. नगर भूमापन झालेल्या सदर गांवातील सर्व नागरिक इतरत्र राहण्यास गेले आहेत. त्यामुळे सद्य:स्थितीत सदर नकाशांचा जनतेस काहीही उपयोग उरलेला नसल्यामुळे, लातूर व उस्मानाबाद जिल्ह्यातील उध्वस्त झालेल्या एकूण २३ गावठाण भूस्थापन योजनेअंतर्गत सदर मिळकतीच्या वसुलीसाठी शिल्लक असलेली सनद फी रूपये ११,९३,९१८/-(अक्षरी अकरा लाख त्र्यान्नव हजार नऊशे अठरा रूपये फक्त) इतकी रक्कम वसुल करणे शक्य होणार नाही. तसेच भविष्यातही सदरची सनद फी ची रक्कम वसूल होण्याची शक्यता दिसून येत नाही. त्यामुळे लातूर व उस्मानाबाद जिल्ह्यातील भूकंपामुळे इतरत्र पूनर्वसन झालेल्या गांवातील सनद फी निर्लेखित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

सन १९९३ मध्ये झालेल्या विनाशकारी भूकंपात लातूर व उस्मानाबाद जिल्ह्यातील उध्वस्त झालेल्या एकूण २३ गावातील मिळकतीच्या वसुलीसाठी खाली नमूद केल्याप्रमाणे शिल्लक असलेली सनद फी रूपये ११,९३,९१८/-(अक्षरी अकरा लाख त्र्यान्नव हजार नऊशे अठरा रुपये फक्त) इतकी रक्कम निर्लेखित करण्यास शासन या व्दारे मान्यता देत आहे.

| अ.क्र | जिल्हा | तालुका | गावांचे नाव | रक्कम (रूपये) |
|---|---|---|---|---|
| १ | लातूर | औसा | आशिव, हसलगण, नांदुर्गा, लामजाणा, किल्लारी, मंगरूळ, तळणी,तपसे चिंचोली, तुर्गी | ३,५२,२४८/- |
| २ | उस्मानाबाद | उमरगा | एकरगा, बलसुर, नारंवाडी, नाईचा पूर, मावुज, येणेगुर, कवठा, पेठ सांगवी | ५,०९,०६३/- |
| | | लोहारा | लोहार, कानेगांव, तावशीगढ, सस्तुर, होळी, जेवळी | ३,३२,६०७/- |
| | | | एकूण | **११,९३,९१८/-** |

२. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-एक च्या अ.क्र.२५(ब), नियम १४६ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६२३१२०३५६३९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2020.06.24 11:11:36 +05'30'

**( डॉ. संतोष भोगले )**
सह सचिव

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२
३. मा. मंत्री/ मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व), मंत्रालय, मुंबई ४०००३२
४. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवान, मुंबई
५. मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सविच, विधान भवन, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खासगी सचिव, विधान भवन, मुंबई
७. उपसभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
८. मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
९. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा) यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
१०. मा.मुख्य सचिव , महाराष्ट्र शासन,मंत्रालय, मुंबई
११. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई
१२. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई

१३. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. महालेखापाल ½ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
१५. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा) मुंबई
१६. जिल्हाधिकारी, लातूर/उस्मानाबाद
१७. अधिदान व लेखा अधिकारी, लातूर/उस्मानाबाद
१८. निवड नस्ती.